**"महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना अधिक प्रभावीपणे राबविणेसाठी नियोजन (रोहयो) विभागाच्या आर्थिक वर्ष २०२५-२६ मधील माध्यम आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत..."**
**(मुंबई शहर व मुंबई उपनगर वगळून)**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन (रोहयो) विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मग्रारो-२०२५/प्र.क्र.१०५/रो-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक : १३ जून २०२५

**वाचा :**

१) महाराष्ट्र रोजगार हमी अधिनियम (सुधारित) कायदा - २०१४

२) सामान्य प्रशासन विभाग यांचे दिनांक १३ ऑगस्ट २०२१ रोजीचे शासन निर्णय

३) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे शासन निर्णय क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२३/का-३४ दिनांक - १३/०८/२०२१

४) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय वृत्तचित्र शाखा /कार्यासन-७ दिनांक ०९ जून २०२५ रोजीच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमबजावणी बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना ही केंद्र पुरस्कृत योजना म्हणून ओळखली जाते. सदर योजनेअंतर्गत विविध अशा २६६ कामांचा समावेश करण्यात आलेला आहे. सदर कामांच्या माध्यमातून ग्रामीण भागातील जनतेला रोजगार उपलब्ध करून देणे व अशा रोजगारातून कायमस्वरूपी मत्ता निर्माण करून अशा मत्ते मधून उत्पन्नाचे साधन मिळवून देणे व गरिबीचे उच्चाटन करणे याकरिता केंद्र पुरस्कृत महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना राज्यात राबविण्यात येत आहे. शून्य भूक व गरीबीचे उच्चाटन याकरिता राज्याने शाश्वत विकासाची ध्येये स्वीकारली असून विविध योजनांनमधून सदर शाश्वत ध्येये साध्य करणे अपेक्षित आहे. सदर योजनांची जास्तीत जास्त प्रमाणात माहिती ग्रामीण भागातील जनतेपर्यंत पोहोचविण्याकरीता प्रचार, प्रसिध्दी या माध्यमांचा वापर करुन जनजागृती करणे आवश्यक आहे. जेणेकरुन गावच्या समृध्दीसाठी व

गावातल्या नागरीकांच्या समृध्दीसाठी अधिकाधिक कामे हाती घेऊन लोकांचे जीवनमान अधिक सुकर करुन त्यांच्या आयुष्यात आनंद निर्माण करता येईल.

आर्थिक वर्ष २०२५-२६ करीता विभागाने सादर केलेला माध्यम आराखडा मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर आराखडयास माहिती व जनसंपर्क महासंचालनालय वृत्तचित्र शाखा / कार्यासन-७ यांच्या दिनांक ०९ जून २०२५ रोजी झालेल्या नियोजन व अंमबजावणी बैठकीत मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

सबब विभागाच्या राज्य योजनेच्या सन २०२५-२६ साठीच्या माध्यम आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी करिता राज्य योजनेच्या सन २०२५-२६ साठीच्या माध्यम आराखडयाच्या इतिवृत्तास माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांनी मान्यता प्रदान केलेली आहे. त्याअनुषंगाने सोबत जोडलेल्या “प्रपत्र अ” अनुसार बैठकीच्या निर्णयातील खालील नमूद बाबींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय विभागामार्फत माध्यम आराखडयाचा कालावधी ३० दिवसांचा मंजूर करण्यात आला आहे. तसेच राज्य निधीच्या अर्थसंकल्पीय अनुदानातून लेखाशिर्ष २५०५००२२ - २६ जाहिरात व प्रसिध्दी यास्तव मंजूर रक्कम रु. २०.०० कोटीच्या मर्यादेत माध्यम आराखडा मंजूर करण्यात येत आहे.

२. सोबत जोडलेल्या “प्रपत्र अ” मध्ये नमूद करण्यात आलेली एलईडी, मोबाईल व्हॅन / चित्ररथ / मोबाईल किऑस्क या माध्यमांवरुन प्रसिद्धी करताना विहित प्रक्रियेचा अवलंब करुन संस्था निश्चित करण्यात येईल. निवड करण्यात आलेल्या संस्थेला प्रचार व प्रसिद्धी करिता ठिकाणांच्या यादीसह योजनांची आवश्यक माहिती या विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल. प्रसिद्धी करताना एका ठिकाणी केवळ एकाच माध्यमाद्वारे प्रसिद्धी होईल, असे नियोजन,

विभागामार्फत करण्यात यावे, जेणेकरुन एकाच ठिकाणी विविध माध्यमांची द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता विभागामार्फत घेण्यात यावी.

३. रोहयो विभागाच्या योजनांची प्रसिध्दी करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची रक्कम माध्यम आराखडयामध्ये दर्शविण्यात आलेली रक्कम अंदाजित असून एखाद्या माध्यमाद्वारे प्रसिध्दी न झाल्यास सदर माध्यमाची रक्कम "प्रपत्र अ" मधील तक्त्यातील इतर कोणत्याही माध्यमामध्ये आवश्यकतेनुसार वापरण्यास तसेच एखाद्या माध्यमामध्ये बदल करण्यास अथवा एखादे नवीन माध्यम समाविष्ठ (अंदाजित खर्चाच्या एकूण मयादेत) करण्यास, तसेच वरील प्रसिध्दी आराखड्यानुसार कार्यवाही करताना अनुभव आणि क्षमता लक्षात घेऊन माध्यमांची निवड, माध्यमांचा वापराचा आकार, जाहिरातीचा कालावधी आणि वारंवारिता ठरविण्याबाबतचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांना असतील.

४. माध्यम आराखड्यामध्ये प्रस्तावित करण्यात आलेल्या माध्यमांचा प्रसिद्धीचा कालावधी ठरविताना, जाहिरात प्रसिद्धीचा कालावधी कमी केल्यास प्रसारणाच्या वारंवारितेमध्ये भरपूर प्रमाणात वाढ होईल, ही बाब लक्षात घेता जाहिरात प्रसिद्धी करण्यासाठी कोणत्याही प्रकारचा नकारात्मक दृष्टीकोन तयार होणार नाही, या दृष्टीने कालावधी व संख्या ठरविण्यात यावी.

५. विभागाच्या माध्यम आराखडयास शासकीय जाहिरात वितरण धोरणाची अंमलबजावणीची कार्यपध्दती शासन निर्णय क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२३/का-३४ दिनांक - १३/०८/२०२१ मधील मुद्दा क्रमांक ५ व ६ नुसार या विभागाने कार्यवाही केली असल्याने निर्मिती व प्रसिध्दीची कार्यवाही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून करण्यात यावी.

६. शासन निर्णय दि.२३ नोव्हेंबर, २०२३ मधील निविदेमध्ये सहभागी होण्याबाबत पात्रता नमूद करण्यात आली असून कार्यक्रमाच्या अंदाजित रकमेच्या आधारे जाहिरात संस्थांची सूचीमधील संस्थांकडून संकल्पना व वित्तीय देकार मागविण्यात येतील.

७. दृक श्राव्यनिर्मिती ई-निविदेमार्फत निश्चित करण्यात आलेल्या संस्थेमार्फत करण्यात येईल. इतर अनुषंगिक व आवश्यक प्रसिद्धी साहित्य तयार करण्यात यावे.

८. सदर योजनेच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी कोणत्या प्रमाणात खर्च करण्याची आवश्यकता आहे व त्याची फलनिष्पती काय आहे याबाबतचा विचार या विभागामार्फत करण्यात येईल.

९.	संबंधित माध्यम आराखडयाच्या रुपरेषानुसार आयोजन करुन घ्यावे, तसेच कार्यक्रम आयोजन करताना संस्थेकडून आपत्ती व्यवस्थापनाच्या अनुषंगाने कोणतीही त्रुटी राहणार नाही, याची खबरदारी विभागाने घ्यावी. त्याचप्रमाणे कार्यक्रम आयोजनात कोणतीही दुर्घटना अथवा अपघात झाल्यास त्याचे उत्तरदायित्व माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडे राहणार नाही.

१०.	या प्रसिद्धी मोहिमेचे महत्त्व लक्षात घेता माहिती व जनसंपर्क महासंचालनालया मार्फत दरपत्रके / ई-निविदा प्रक्रिया राबवून तसेच प्रसिध्दीच्या कामाची व्याप्ती विचारात घेता योग्य त्या संस्थेची निवड विभागाच्या मान्यतेने करावी.

११.	रोहयो विभागाने प्रसिद्धीनंतर देयके पारित करताना आवश्यक असलेल्या बाह्यमाध्यमांचे जिओ टॅग, फोटो (पहिल्या व शेवटच्या दिवसाचे ) आवश्यकते नुसार तसेच ज्या माध्यमाकडे एकाधिकार आहेत, अशा माध्यमांचे त्या - त्या संबंधित कंपनीचे काम पूर्ण केल्याबाबतचे प्रमाणपत्र देयके तपासणीकरिता आवश्यक राहील.

१२.	निर्मिती / कार्यक्रमाची प्रसिध्दी / आयोजन/ व्यवस्थापन पूर्ण झाल्यानंतर देयकासंदर्भातील संपूर्ण कार्यवाही रोहयो विभागामार्फत देण्यात आलेल्या तपशीलानुसार आणि वित्तीय देकारासोबत जोडण्यात आलेल्या कामाच्या तपशिलानुसार संबंधित संस्थेने काम केले आहे किंवा कसे याबाबतची पडताळणी करुनच विभाग देयके अदा करेल. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत कोणत्याही प्रकारची देयके प्रमाणित केली जाणार नाहीत.

१३.	माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत कार्यक्रमाच्या कोणत्याही जाहिराती अंतिम करून देण्यात येणार नाही. जाहिराती अंतिम करण्याची संपूर्ण जबाबदारी रोहयो विभागाच्या विभागप्रमुखांची राहील. विभागाकडून जाहिराती अंतिम करुन दिल्यानंतरच महासंचालनालयामार्फत प्रसिद्धी संदर्भातील पुढील कार्यवाही करण्यात येईल. तसेच शासन निर्णयातील तरतुदीनुसार जाहिरात निर्मिती / प्रसिद्धी संदर्भातील कोणतीही देयके महासंचालनालयामार्फत प्रमाणित केली जाणार नाहीत.

१४.	रोहयो विभागाच्या प्रस्तावित बाहयमाध्यमांद्वारे करावयाच्या प्रसिद्धीच्या अनुषंगाने प्रत्येक माध्यमांची क्षमता व उपलब्धता तसेच वारंवारिता इत्यादी सर्व बाबी तपासून त्यानंतर कार्यादेश निर्गमित करण्यासाठी काही कालावधी लागू शकतो.

१५. प्रसिध्दी करण्यात येणाऱ्या जाहिरातींचे नियंत्रण रोहयो विभागामार्फत राज्यातील जिल्हा, तालुका व क्षेत्रीय स्तरावरील कार्यालयामार्फत करण्यात येईल.

१६. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत एकाधिकार प्राप्त असलेल्या संस्थांना दि.११ जुलै २०२३ व दि.१२ जुलै, २०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये कार्यादेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

राज्य योजनेअंतर्गत सन २०२५-२६ करीता राबविण्यात येणाऱ्या माध्यम आराखडयावरील बाबींवर होणारा खर्च रक्कम रुपये १९,९९,६०,०००/- (अक्षरी एकोणीस कोटी नव्यान्नव लक्ष साठ हजार फक्त) हा जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशिर्षाखाली २५०५ ००२२ (२६ - जाहिरात व प्रसिध्दी) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२५-२०२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध असलेल्या राज्याच्या अर्थसंकल्पीय मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

विभागाच्या माध्यम आराखडयास माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांच्या शासन निर्णय, क्रमांक मावज-२०२१/प्र.क्र.१२३/का-३४ दिनांक-१३.०८.२०२१ मध्ये विहित केल्यानुसार व माहिती व जनसंपर्क महासंचालनालय वृत्तचित्र शाखा / कार्यासन - ७ दिनांक ०९ जून २०२५ रोजी झालेल्या माध्यम आराखडा नियोजन व अंमबजावणी बैठकीच्या इतिवृत्तानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०६१३१८३८२८७११६ असा असून सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

ATUL ASHOK KODE

Digitally signed by ATUL ASHOK KODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F0D5EE4C99CC9CBFA8761B3DDC7BD6650BAD33302F33A35400AD5AAD2291371A, cn=ATUL ASHOK KODE
Date: 2025.06.13 18:40:04 +05'30'

**(अतुल कोदे)**

**सहसचिव (रोहयो), महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२,
२. मा. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) -१/२, मुंबई/नागपूर,

३. संचालक (एनआरजीए), ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषी भवन, नवी दिल्ली - ११० ००१,

४. मा. सचिव (रोहयो) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ३२

५. मा. सचिव, लेखा व कोषागारे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२

६. सर्व विभागीय आयुक्त

७. उपसचिव (NREGA), ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषी भवन, नवी दिल्ली - ११० ००१

८. मा. आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना - महाराष्ट्र, नागपूर,

९. आयुक्त, कृषी आयुक्तालय, पुणे.

१०. जिल्हाधिकारी (सर्व)

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१२. सर्व उपायुक्त (रोहयो), विभागीय आयुक्त कार्यालये

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

१४. संचालक (मृदसंधारण), कृषी आयुक्तालय, पुणे.

१५. मुख्य अभियंता (मृद व जलसंधारण)

१६. सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी

१७. सर्व जिल्हा रेशीम अधिकारी.

१८. सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो)

१९. सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (नरेगा, ग्रामपंचायत)

२०. सर्व गटविकास अधिकारी, नरेगा

२१. उपवनसंरक्षक (सर्व)

२२. उपसंचालक, सामाजिक वनीकरण (सर्व)

२३. उपसचिव (रोहयो), मंत्रालय, मुंबई- ३२

२४. नियोजन विभाग (का.१४३४ व का.१४२४)

२५. रोहयो सर्व कार्यासने

२६. वित्त विभाग (अर्थ -१६, व्यय-८)

२७. निवड नस्ती, रोहयो - ७

| “प्रपत्र अ” | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| माहिती व जनसंपर्क महासंचालनालय | | | | | | | | |
| नियोजन विभागाच्या महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या (रोहयो) व्यापक प्रसिध्दी करीता प्रस्तावित अंदाजित माध्यम आराखडा | | | | | | | | |
| अ क्र | माध्यम | स्वरुप | तपशील | रक्कम (प्रतिनग) | संख्या | एकूण अंदाजित रक्कम | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
| १ | निर्मिती साहित्य (Production of Creative) | टिव्हीसी विथ सेलिब्रिटी | TVC ४५ ते ६० Sec As per DAVP Rate | २०,००,००० | ८ | १,६०,००,००० | २८,८०,००० | १,८८,८०,००० |
| | | | Total A | | | **१,६०,००,०००** | **२८,८०,०००** | **१,८८,८०,०००** |
| अ क्र | Media | मूळ दर, प्रक्रीया | Details | वारंवारिता | संख्या / दिवस | एकूण अंदाजित रक्कम | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
| इलेक्ट्रॉनिक्स दृक - श्राव्ये माध्यम (वृत्तचित्र शाखा) | | | | | | | | |
| १ | स्थानिक केबलद्वारे प्रसिध्दी | सीबीसी दर | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचीमधील संस्थार्फत विहीत कार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल या माध्यमांशी निगडीत संस्थांनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० | २,००,००,००० | ३६,००,००० | २,३६,००,००० |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बाहय माध्यमाद्वारे प्रसिध्दी (प्रदर्शने शाखा) | | | | | | | | |
| १ | एल ई डी मोबाईलद्वारे योजनांची प्रसिध्दी | विहीत ई - निविदा प्रक्रीयेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचिमधील संस्थार्फत विहीतकार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल यामाध्यमांशी निगडीत संस्थांनी निविदे मध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० | २,४८,००,००० | ४४,६४,००० | २,९२,६४,००० |
| २ | चित्ररथाद्वारे योजनांची प्रसिध्दी | विहीत ई - निविदा प्रक्रीयेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचिमधील संस्थार्फत विहीत कार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल यामाध्यमांशी निगडीत संस्थांनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० | २,००,००,००० | ३६,००,००० | २,३६,००,००० |
| ३ | बीटीएल कॅम्पेन ॲक्टीव्हीटी मोबाईल की - ऑस्करद्वारे प्रसिध्दी | विहीत ई - निविदा प्रक्रीयेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचिमधील संस्थार्फत विहीत कार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल यामाध्यमांशी निगडीत संस्थांनी निविदे मध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० | २,५०,००,००० | ४५,००,००० | २,९५,००,००० |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **समाज माध्यमांद्वारे प्रसिध्दी (समाज माध्यम शाखा)** | | | | | | | | |
| १ | सोशल मिडीया (Social Media) | विहीत ई - निविदा प्रक्रीयेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचिमधील संस्थार्फत विहीतकार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल यामाध्यमांशी निगडीत संस्थांनी निविदे मध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० | ३,००,००,००० | ५४,००,००० | ३,५४,००,००० |
| २ | डिजीटल मिडीया, ओटीटी माध्यमांद्वारे प्रसिध्दी | विहीत ई - निविदा प्रक्रीयेद्वारे | शासन निर्णय दि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचिमधील संस्थार्फत विहीतकार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल यामाध्यमांशी निगडीत संस्थांनी निविदे मध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० | ३,००,००,००० | ५४,००,००० | ३,५४,००,००० |
| | | | Total B | | | **१४,९८,००,०००** | | **१७,६७,६४,०००** |
| | | | Total A + B | | | **१६,५८,००,०००** | | **१९,५६,४४,०००** |
| १ | शा.नि.दि.१३/०८/२०२१ नुसार रक्कम रु.५.०० कोटी इतक्या रकमेपर्यंतच्या प्रसिध्दी आराखडयासाठी एकूण खर्चाच्या ४ % (रु.२० लाख) आणि त्यापेक्षा प्रत्येक वाढीव रकमेसाठी २ % (उर्वरित रकमेवर (रु.५.०० कोटी वजा जाता)) प्रमाणे | शासन निर्णय तरतुदी नुसार | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणाऱ्या कार्यालयीन उपकरणांवरील खर्च, सॉफ्टवेअर, तात्पुरत्या मनुष्यबळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च इतर किरकोळ खर्च | | | ४३,१६,००० | | ४३,१६,००० |
| | | | **एकूण रक्कम रुपये** | | | **१७,०१,१६,०००** | | **१९,९९,६०,०००** |